कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, या पदी नामनिर्देशनाने नियुक्ती देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन आदेश क्रमांकः आपना ४५१२/प्र.क्र.२१०/पापु १५

गो.ते.रुग्णालय संकुल, ७ वा माळा,
लो.टि.मार्ग, क्रॉफर्ड मार्केट, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: ७ एप्रिल, २०१५

**वाचा :-**

१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. १७७९ (३१)/२५३२/पंधरा,दिनांक २९ ऑक्टोबर,२०१४

**प्रस्तावना :-**

कनिष्ठ भूवैज्ञानिक, महाराष्ट्र भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,गट-ब या पदाच्या जाहिरातीमध्ये (जाहिरात ३४२/२०१३) नमूद केल्यानुसार अनुषेशाच्या एकूण ३४ पदांपैकी विकलांगासाठी तीन पदे तर चालु रिक्त १७ पदांपैकी एक पद विकलांग प्रवर्गाकरिता राखीव होती.विकलांग प्रवर्गाचा एकही सुयोग्य उमेदवार उपलब्ध न झाल्याने चालु रिक्त १७ पदांपैकी ४ पदे व अनुषेशाच्या ३४ पदांपैकी ३ पदे (इ.मा.व.-१, अ.जा.-१ व अ.ज.-१) अशी एकूण ७ पदे रिक्त ठेवून सदर पदाचा निकाल आयोगाकडून दिनांक २९ मार्च, २०१४ रोजी जाहिर करण्यात आला होता.तद्नंतर शासनाकडून प्राप्त झालेल्या माहितीनुसार एकूण ४ पदावर पात्र उमेदवार उपलब्ध न झाल्याने ती ४ पदे चालू आरक्षणाच्या १७ पदांपैकी राखून ठेवणे आवश्यक असल्याचे शासनाने आयोगास कळविल्याने आता अनुषेशाच्या ३४ पदांपैकी ३ पदांसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या उक्त वाचा येथे नमूद केलेल्या पत्रान्वये तीन उमेदवारांची त्यांच्या गुणवत्ताक्रमानुसार शिफारस केली आहे.

**शासन आदेश :-**

उपरोक्त प्रस्तावनेस अनुसरुन महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यासाठी वाचा येथे नमूद केलेल्या पत्रानुसार केलेल्या शिफारशीनुसार खालील तक्त्यात नमूद केलेल्या उमेदवारांची वेतन बँड रु.९३००-३४८००,ग्रेड वेतन रु. ४५००/- अधिक त्यावर नियमानुसार मिळणारे महागाई व

इतर भत्ते या वेतनश्रेणीत ते ज्या दिनांकापासून पदभार स्विकारतील, त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी या आदेशातील परिच्छेद क्र.२ मध्ये दिलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहून नेमणूका करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | गुणवत्ता क्र. | उमेदवाराचे नाव | वर्गवारी | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | १ | श्री.खंदारे राहुल प्रकाश | अजा | SC (Sports) Against-१ |
| २ | २ | श्री. चिंचमलातपूरे प्रतिक रमेशराव | इ.मा.व. | O.B.C. (Sports) Against-१ |
| ३ | ३ | श्री.श्रीरामे वैभव पुंजीराम | अज | ST (F) Against-१ |

२. अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहिल.

१) सदर उमेदवारांनी आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या (३० दिवस) आत पदभार स्विकारावा.

२) सदर उमेदवार विहीत मुदतीत कामावर रुजू न झाल्यास संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी शासनाकडे उचित कार्यवाहीसाठी अहवाल पाठवावा.

३) सदर उमेदवारांनी पदग्रहण प्रतिवेदन संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांच्या मार्फत सादर करावे.

४) सदर उमेदवारांना परिविक्षा कालावधीमध्ये पहिल्या वर्षानंतर वेतनवाढ देण्यात यावी आणि त्यापुढील वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यावर देण्यात यावी.

५) सदर उमेदवारांना विहित विभागीय परीक्षा उत्तीर्ण व्हावी लागेल. तसेच, ते अगोदरच विभागीय परीक्षा उत्तीर्ण झाले नसतील किंवा त्यांना त्या परिक्षेतून सूट मिळाली नसेल तर विहीत नियमानुसार विभागीय परीक्षा, मराठी व हिंदी भाषा परीक्षाही उत्तीर्ण व्हावी लागेल.

६) सदर उमेदवारांनी कामाचा अपेक्षित दर्जा न राखल्यास आणि विहित विभागीय परीक्षा परिविक्षा कालावधीमध्ये उत्तीर्ण न केल्यास आणि अशा तऱ्हेने त्यांचे काम किंवा वर्तणूक अयोग्य आढळल्यास त्यांना सेवेतून कमी करण्यात येईल.

७) सदर उमेदवारांना राजीनामा द्यावयाचा असेल तर त्यांनी शासनाला कमीत कमी एक महिन्याची पूर्वसूचना दिली पाहिजे. त्यांना सेवेतून कमी करावयाचे झाल्यास शासनही एक महिन्याची पूर्वसूचना देईल. तथापी, त्यांच्या सेवेच्या काळामध्ये गैरवर्तन व सेवेच्या शर्तीचा भंग झाला तर अशी पूर्वसूचना न देता त्यांना कामावरून कमी करण्यात येईल. पूर्वसूचनेचा एक महिन्याचा कालावधी शासन वेळोवेळी जे बदल करील त्या बदलांना अधीन राहून ठरविण्यात येईल.

८) सदर उमेदवारांचा परिविक्षा कालावधी संपल्यानंतर संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. एमआरव्ही १०६२/डी, दिनांक २६/४/१९६२ मध्ये विहीत केलेल्या नमून्यात त्यांच्या कामाबाबतचा खास अहवाल (दोन प्रतीत) शासनाकडे पाठवावा.

९) खालील तक्त्यात नमूद उमेदवारांनी त्यांच्या सांक्षाकन नमुन्यात दिलेल्या माहितीनुसार तक्त्यातील त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पोलिस कार्यालयाकडून त्यांचे चारित्र्य/ पुर्वचारित्र्य पडताळणी होऊन त्याबाबतचा अहवाल शासनास अद्याप प्राप्त झालेला नाही.तरी त्यांना सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ९/१/२००९ च्या शासननिर्णयातील अटींच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | पोलिस कार्यालय |
|---|---|---|
| १ | श्री.खंदारे राहुल प्रकाश | पुणे शहर येथील वास्तव्याचा चारित्र्य पडताळणी अहवाल पोलिस आयुक्तालय, पुणे या कार्यालयाकडून अप्राप्त आहे. |
| २ | श्री. चिंचमलातपूरे प्रतिक रमेशराव | चिखलदरा, चांदुरबाजार, जि.अमरावती व मुंबई शहर येथील वास्तव्याचा चारित्र्य पडताळणी अहवाल अनुक्रमे पोलीस अधिक्षक, अमरावती व पोलिस आयुक्त, मुंबई या कार्यालयाकडून अप्राप्त आहे. |

१०) सदर नियुक्ती आदेश गट-अ व गट-ब पदावर सरळसेवेने नियुक्तीसाठी विभागीय संवर्ग संरचना व विभागीय संवर्ग वाटप याबाबत सा.प्र.वि.ने दिनांक २१.०६.२०१० रोजी निर्गमित केलेल्या परिपत्रकानुसार तसेच, सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

३. प्रस्तुत प्रकरणी महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत सदर उमेदवारांना उक्त परिच्छेदात नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून खालीलप्रमाणे नियुक्ती/पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | गुणवत्ता क्र. | उमेदवाराचे नाव | पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | १ | श्री.खंदारे राहुल प्रकाश | वरिष्ठ भूवैज्ञानिक, भू.स.वि.यं.,सातारा |
| २ | २ | श्री. चिंचमलातपूरे प्रतिक रमेशराव | वरिष्ठ भूवैज्ञानिक, भू.स.वि.यं., यवतमाळ |
| ३ | ३ | श्री.श्रीरामे वैभव पुंजीराम | ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बीड |

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११८१५३५४६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.04.07 17:27:51 +05'30'

**( महेश भ. सावंत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,भूजल भवन, शिवाजी नगर, पुणे
२) महालेखाकार महाराष्ट्र-१ /२, मुंबई/नागपूर (लेखापरिक्षण /लेखा व अनुज्ञेयता)
३) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग मुंबई (पत्राने)
४) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,(सर्व)
५) जिल्हा कोषागार अधिकारी,सातारा,यवतमाळ, बीड.
६) संबंधित उमेदवार (संचालकांमार्फत)
७) सामान्य प्रशासन विभाग (१२/१६) मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२